**उच्चदाब वितरण प्रणाली योजनेच्या सुधारित प्रकल्प किंमतीस तसेच योजनेस मुदतवाढ.**

## महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : उविप्र-२०१८/प्र.क्र.३० /ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ सप्टेंबर, २०२१.

वाचा -: शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्रमांक : उविप्र-२०१८/प्र.क्र.३० /ऊर्जा-५ दिनांक : ०५ मे २०१८.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाने दिनांक ३१/०३/२०१८ पर्यंत नवीन विद्युत पुरवठयाकरीता पैसे भरलेल्या कृषीपंप अर्जदारांना वीज पुरवठा करण्याकरीता संदर्भिय शासन निर्णयान्वये रुपये ५०४८.१३ कोटीच्या उच्चदाब वितरण प्रणाली योजनेस महावितरण कंपनीद्वारे अंमलबजावणी करण्यास मान्यता दिली आहे. या योजनेअंतर्गत पैसे भरलेल्या २.२४ लाख कृषीपंप अर्जदारांना वीज पुरवठा करण्याकरीता तसेच विद्यमान व संभाव्य कृषीपंपांचा वीज भार वितरित करण्याकरीता २२६ वीज उपकेंद्रे स्थापित करण्याचा समावेश आहे. सदर योजना सन २०१८-१९ व २०१९-२० या वर्षात पूर्ण करण्यास मान्यता देण्यात आली होती. उच्चदाब वितरण प्रणाली योजनेकरीता विदर्भ व मराठवाडा विभागासाठी रु.२२४८.१३ कोटी इतकी रक्कम राज्य शासन अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन देणार आहे.

उर्वरित महाराष्ट्राकरीता (विदर्भ व मराठवाडा विभाग वगळून) रु.२८०० कोटी इतकी रक्कम, महावितरण कंपनी शासन हमीने वित्तीय संस्थांकडून कर्ज स्वरुपात उपलब्ध करुन घेणार आहे. यापैकी शासन निर्णय: क्र.शाहमी-२०१९/उउकावि / प्र.क्र.४२ / अर्थबळ, दिनांक १८ मे, २०२० अन्वये पंजाब नॅशनल बँकेकडून रू.१५०० कोटी घेण्यास मंजूरी देण्यात आली आहे. याअंतर्गत दि.०७ जूलै २०२१ पर्यंत रु.६३०.३२ कोटी इतके कर्ज महावितरण कंपनीस प्राप्त झाले आहे. तसेच शासन निर्णय: क्र.शाहमी-२०१९/उउकावि / प्र.क्र.४२ / अर्थबळ, दिनांक २४ जून, २०२१ अन्वये पंजाब व सिंध बँक, मुंबई यांच्याकडून रू.१३०० कोटी कर्ज घेण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

राज्य शासन एशियन डेव्हलपमेंट बँकेकडून उच्चदाब वितरण प्रणाली योजनेच्या प्रगतीवर आधारित कर्ज घेणार आहे. दिनांक ३०.०४.२०२० रोजी एशियन डेव्हलपमेंट बँकेने ३४६ दशलक्ष युएस डॉलर इतक्या कर्जास मान्यता दिली आहे. दिनांक १९.१०.२०२० रोजी केंद्रशासन व राज्यशासन यांच्यामध्ये कर्ज करारनामा करण्यात आला आहे. तसेच महावितरण व एशियन डेव्हलपमेंट बँक यांच्यामध्ये प्रोग्रॅम ॲग्रीमेंट करण्यात आले आहे. माहे जुलै, २०२१ अखेर १९३.०४ दशलक्ष युस डॉलर इतकी रक्कम राज्य शासनास एशियन डेव्हलपमेंट बँकेने वितरित केली आहे. सदरचे निधी वितरण हे उच्चदाब वितरण प्रणाली योजना राबविल्यानंतर प्रत्यक्षात मिळणाऱ्या तांत्रिक व वाणिज्यिक परिणामांवर आधारित ठेवण्यात आले आहे. तसेच तांत्रिक व वाणिज्यिक परिणामांची खातरजमा त्रयस्थ संस्थेमार्फत क्षेत्रीय परिक्षण करुन करण्यात येत आहे. याकरिता संपूर्ण राज्यातील योजनेची प्रगती विचारात घेतली जात आहे.

उच्चदाब वितरण प्रणाली योजनेचा कालावधी संदर्भिय शासन निर्णयानुसार सन २०१८-१९ व सन २०१९-२० या कालावधीकरिता मंजूर होता. सदर योजनेअंतर्गत १०/१६/२५ केव्हीए क्षमतेचे रोहित्र प्रत्येकी एक किंवा दोन कृषीपंपामागे उभारणे ही संकल्पना नव्याने अंमलात आणल्याने पुरवठादारांकडून

पुरवठा होण्यास सुरूवातीस विलंब झाला. जीएसटी करप्रणाली तसेच ॲल्युमिनियम, कॉपर, स्टील वगैरे धातूंच्या दरांच्या किंमती मध्ये वाढ झाल्याने व महावितरण कंपनीने २०१७-२०१८ च्या दरसुचीनुसार अंदाजपत्रक केल्यामुळे निविदाकारांचा मूळ किंमतीस प्रतिसाद मिळाला नाही. त्यामुळे काही जिल्ह्यांमध्ये ४ ते ५ वेळा निविदा स्विकारण्याच्या तारखा पुढे ढकलण्यात आल्या. कोव्हीड-१९ चा प्रादुर्भावामुळे संपूर्ण देशात मार्च, २०२० पासून सप्टेंबर- ऑक्टोबर, २०२० पर्यंत टाळेबंदी लागु असल्याने योजनेची प्रगती होऊ शकली नाही. उर्वरित महाराष्ट्रातील वीज जोडण्या देण्याकरिता येणारा खर्च महावितरण कंपनीमार्फत बँकांकडून कर्ज उभारून करावयाचा आहे. या कार्यवाही दरम्यान संबंधित बँकांचे विलीनीकरण तसेच कोव्हीड-१९ मुळे झालेली टाळेबंदी या कारणांमुळे कर्ज पुरवठा होण्यास विलंब लागला. यामुळे सदर योजनेचा कालावधी मार्च, २०२३ पर्यंत वाढविण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे. तसेच विदर्भ व मराठवाडा विभागातील अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती या वर्गवारीतील लाभार्थ्यांची संख्या अनुमानित लाभार्थ्यांपेक्षा प्रत्यक्षात कमी आढळल्याने परिणामी सर्वसाधारण वर्गवारीतील लाभार्थ्यांच्या संख्येत वाढ झाली. त्यामुळे अनुदानामध्ये रूपये ७८०.७३ कोटी इतकी वाढ झाली. परंतु प्रत्यक्ष योजनेची अंमलबजावणी सुरु होण्यापूर्वी इतर योजनांमधून वीज जोडण्या दिल्याने उर्वरित महाराष्ट्रातील लाभार्थ्यांची संख्या कमी झाली परिणामी योजनेचा प्रकल्प खर्च रू. ५०४८.१३ कोटी वरून रू. ४७३४.६१ कोटी इतकी झाला.

उपरोक्त बाबी विचारात घेता उच्चदाब वितरण प्रणाली योजनेच्या सुधारित खर्चास व योजनेस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## <u>२. शासन निर्णय:</u>

१. उच्चदाब वितरण प्रणाली योजनेचा सुधारीत खर्च रु.५०४८.१३ कोटी वरुन रु.४७३४.६१ कोटी इतका करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उच्चदाब वितरण प्रणाली योजने अंतर्गत दिनांक ३१ मार्च २०१८ अखेर वीज जोडणीकरिता प्रलंबित असणाऱ्या कृषीपंप अर्जदारांना वीज जोडण्या देण्याकरिता सदर योजनेची मुदत दिनांक ३१ मार्च २०२३ पर्यंत वाढविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. विदर्भ व मराठवाडा विभागातील सर्वसाधारण प्रवर्गातील मार्च-२०१८ अखेर प्रलंबित कृषिपंप ऊर्जीकरणाकरीता लागणाऱ्या अनुदानामध्ये (लेखाशिर्ष २८०१५५१६) रु.७८०.७३ कोटी इतकी वाढ झाली असल्याने या वाढीव खर्चास मंजूरी देण्यात येत आहे व सदर निधी महावितरण कंपनीस अनुदान स्वरूपात उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. महावितरण कंपनीकडे उच्चदाब वितरण प्रणाली योजनेअंतर्गत आदिवासी विकास विभागाचे शिल्लक असलेले अनुदान व उर्वरित वीज जोडण्या देण्याकरिता लागणारे अतिरिक्त अनुदान उर्वरित महाराष्ट्रातील (विदर्भ व मराठवाडा विभाग वगळून) दिनांक ३१.०३.२०१८ अखेर पैसे भरुन वीज जोडणीकरिता प्रलंबित असलेल्या अनुसूचित जमाती वर्गवारीतील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता प्राथम्याने खर्च करण्याबाबत मान्यता देण्यात येत आहे. तसेच “कृषीपंप वीज जोडणी धोरण-२०२०” अंतर्गत धोरण कालावधीत दिनांक ०१.०४.२०१८ नंतरच्या वीज जोडणीकरिता प्रलंबित असणाऱ्या संपुर्ण राज्यातील अनुसूचित जमाती वर्गवारीतील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता ह्या योजनेतून खर्च करण्याबाबत मान्यता देण्यात येत आहे.

५. महावितरण कंपनीकडे उच्चदाब वितरण प्रणाली योजनेअंतर्गत अनुसूचित जाती विशेष घटक कार्यक्रमाअंतर्गत शिल्लक असलेले अनुदान व उर्वरित वीज जोडण्या देण्याकरिता लागणारे अतिरिक्त अनुदान उर्वरित महाराष्ट्रातील (विदर्भ व मराठवाडा विभाग वगळून) दिनांक ३१.०३.२०१८ अखेर पैसे भरुन वीज जोडणीकरिता प्रलंबित असलेल्या अनुसूचित जाती वर्गवारीतील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता प्राथम्याने खर्च करण्याबाबत मान्यता देण्यात येत आहे. तसेच “कृषीपंप वीज

जोडणी धोरण-२०२०" अंतर्गत धोरण कालावधीत दिनांक ०१.०४.२०१८ नंतरच्या वीज जोडणीकरिता प्रलंबित असणाऱ्या संपुर्ण राज्यातील अनुसूचित जाती वर्गवारीतील कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता ह्या योजनेतून खर्च करण्याबाबत मान्यता देण्यात येत आहे.

३. वरील निर्णयानुसार महावितरण कंपनीने तात्काळ अंमलबजावणी सुरु करुन शासनास प्रत्येक महिन्यात अहवाल सादर करावा.

४. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक: मुसका-२०१५/ई-१५७११०/का-१, दि. २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१०९१५१६२८५६६०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2021.09.15 16:30:04 +05'30'

**( प्रशांत बडगेरी )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत:**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
७. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग ,मंत्रालय , मुंबई.
१०. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व मंत्रालयीन विभाग
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर .
१५. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१८. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. अवर सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. अवर सचिव (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.